(१४ पैकी शासन निर्णय क्र.५)
**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत. शासकीय अभियोक्त्यांना नियतकालिक प्रशिक्षण देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ मे, २०१५

**वाचा :**

सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र. टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ दिनांक २३/९/२०११

**प्रस्तावना :**

पोलीस ठाण्यामध्ये गुन्हा दाखल झाल्यानंतर तपासाअंती न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यात येते. तपासातील पुराव्याच्या आधारे न्यायालयामध्ये दोषारोपसिध्दीबाबत खटला चालू राहतो. न्यायालयात दोषारोप सिध्द होण्याचे प्रमाण वाढविण्यासाठी शासकीय अभियोक्त्यांनी कायद्यातील बदलासोबत अद्यावत राहणे गरजेचे आहे.संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्याचे प्रशिक्षण धोरण निश्चित केले असून, त्याअनुषंगाने सर्व शासकीय अभियोक्त्यांना नियतकालीक प्रशिक्षण देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील सर्व शासकीय अभियोक्त्यांना “राज्य प्रशिक्षण धोरण” च्या अनुषंगाने नियतकालीक प्रशिक्षण देण्याचा निर्णय शासन घेत आहे.

२. संचालक, अभियोग संचालनालय यांनी राज्यातील सर्व सरकारी अभियोक्ता, अतिरिक्त सरकारी अभियोक्ता, सहाय्यक सरकारी अभियोक्ता व विशेष सरकारी अभियोक्ता यांना द्यावयाच्या आवश्यक उजळणी अभ्यासक्रम (Refresher Course) तज्ञामार्फत तयार करून घ्यावा.

३. उजळणी अभ्यासक्रमात मा. सर्वोच्च न्यायालय व मा. उच्च न्यायालयाने दिलेले निकाल, नवीन नियमाची माहिती व नुकत्याच झालेल्या निकालाबद्दल माहिती देणे इत्यादी बाबी अंतर्भुत कराव्यात तसेच,उजळणी अभ्यासक्रमामध्ये कालानुरुप आवश्यक ते बदल करण्यात यावेत.

४. शासकीय अभियोक्ते यांचा सेवा कालावधी व कामाचे स्वरुप विचारात घेऊन टप्प्या टप्प्याने प्रशिक्षणाचा कार्यक्रम निश्चित करावा.

५. प्रशिक्षणाकरिता शासकिय अभियोक्ता यांची संख्या निश्चित करताना उपलब्ध अधिका-यांची संख्या विचारात घ्यावी जेणेकरुन खटल्यांच्या सुनावणीवर परिणाम होणार नाही.

६. सर्व शासकिय अभियोक्त्यांना वर्षातून किमान एक आठवडा उजळणी अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण मिळेल याची दक्षता घ्यावी.

७. यशदा,पुणे या राज्याच्या "शिखर प्रशिक्षण संस्था" शी सल्लामसलत करुन शासकिय अभियोक्ता प्रशिक्षणाचा अभ्यासक्रम तयार करणे, प्रशिक्षणाचे नियोजन करणे व अंमलबजावणी करणे याबाबतची कार्यवाही करावी.

८. प्रत्येक आर्थिक वर्षाकरिता प्रशिक्षणाचा सुनिश्चित आराखडा तयार करुन संचालक, अभियोग संचालनालय यांनी प्रशासकिय विभागाच्या मान्यतेने आर्थिक तरतूद करून घ्यावी. जेणेकरुन संबधित आर्थिक वर्षात प्रशिक्षण कार्यक्रम राबविणे सुलभ होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१७१४५१३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.12 19:59:03 +05'30'

**(द.सं.पाटील)**
उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
५. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
६. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
८. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई

९. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
१०. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
११. सर्व पोलीस आयुक्त
१२. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१३. सर्व अपर पोलीस महासंचालक
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१६. सर्व पोलीस अधीक्षक
१७. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१८. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१९. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
२०. उप सचिव (पोल-१०)
२१. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती